**राज्यातील अनुसूचित जमातीच्या इ. १ ली ते १० वी मध्ये शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थ्यांकरिता "सुवर्ण महोत्सवी आदिवासी पूर्व माध्यमिक शिष्यवृत्ती योजना" लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : आविशि-२००९/प्र.क्र.२०/का.१२**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-३२.**
**दिनांक : ३१ मे, २०१०.**

**प्रस्तावना** :- सन २००१ च्या जनगणनेनुसार महाराष्ट्राची एकूण लोकसंख्या ९.६८ कोटी इतकी असून त्यापैकी अनुसुचित जमातीची लोकसंख्या ८५.७७ लक्ष इतकी आहे. सदर लोकसंख्या राज्याच्या लोकसंख्येच्या ८.८५% इतकी आहे. सन २००१ च्या जनगणनेनुसार अनुसूचित जमातीच्या साक्षरतेचा दर ६१.१% इतका आहे. तसेच अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांचे गळतीचे प्रमाण हे प्राथमिक शाळेतील १८.९१% व माध्यमिक शाळेतील ४४.2% एवढे आहे.

आदिवासी विकास विभागामार्फत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांकरिता आश्रमशाळा, वसतिगृहे, मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजना, आदिवासी मुलींची गळती थांबविण्यासाठी प्रोत्साहन, व्यावसायिक अभ्यासक्रमासाठी शिक्षण शुल्काची प्रतिपूर्ती इ.योजना राबविण्यात येतात. परंतु राज्यातील अनुसूचित जमातीच्या इ.१ ली ते १० वी मध्ये आश्रमशाळांव्यतिरिक्त शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थ्यांकरिता प्रोत्साहनात्मक योजना कार्यान्वित नाही. म्हणून इ.१ ली ते १० वी मध्ये शिक्षण घेत असलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांचा शैक्षणिक व इतर किरकोळ खर्च भागविण्यासाठी केरळ व राजस्थान राज्याच्या धर्तीवर पूर्व माध्यमिक शिष्यवृत्ती योजना लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- इ.१ ली ते १० वी मध्ये शिक्षण घेत असलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांचा शैक्षणिक तसेच इतर किरकोळ खर्च भागविण्यासाठी "सुवर्ण महोत्सवी आदिवासी पूर्व माध्यमिक शिष्यवृत्ती योजना" शैक्षणिक वर्ष २०१०-११ पासून लागू करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेअंतर्गत देण्यात येणाऱ्या शिष्यवृत्तीचे दर खालीलप्रमाणे राहतील :-

| अ.क्र. | इयत्ता | शिष्यवृत्तीचा वार्षिक दर प्रती विद्यार्थी/प्रति विद्यार्थिनी |
|---|---|---|
| १ | इ. १ ली ते ४ थी | रु.१०००/- |
| २ | इ. ५ वी ते ७ वी | रु.१५००/- |
| ३ | इ.८ वी ते १० वी | रु.२०००/- |

३. सदर योजनेच्या अटी व शर्ती खालीलप्रमाणे राहतील :-

(१) शासकीय व अनुदानीत आश्रमशाळांमध्ये शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना सदर योजनेचा लाभ अनुज्ञेय राहणार नाही.

(२) नामांकित शाळांमध्ये, सैनिकी शाळांमध्ये, इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये शिक्षण घेत असलेल्या ज्यामध्ये शासनाकडून त्यांच्या शिक्षणाचा खर्च अदा करण्यात येतो अशा अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना सदर शिष्यवृत्तीचा लाभ अनुज्ञेय राहणार नाही.

(३) ज्या विद्यार्थ्यांचे पालक शासकीय, निमशासकीय (केंद्र व राज्य शासन) व इतर स्थानिक स्वराज्य संस्थांच्या (केंद्र व राज्याच्या) तसेच शासन अनुदानीत संस्थांमध्ये सेवा करीत आहेत, तसेच ज्यांच्या कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न रु.१.०८ लाख किंवा त्यापेक्षा जास्त आहे, अशा विद्यार्थ्यांना उपरोक्त शिष्यवृत्ती अनुज्ञेय राहणार नाही.

(४) अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांची उपस्थिती प्रतीमाह ८०% असणे आवश्यक राहील.

(५) नापास झालेल्या विद्यार्थ्यांना त्याच इयत्तेमध्ये दुस-यांदा सदर योजनेचा लाभ अनुज्ञेय राहणार नाही. परंतु सदर नापास विद्यार्थी पास होऊन त्यांनी वरच्या इयत्तेत प्रवेश मिळविल्यास त्यांना त्या इयत्तेमध्ये सदर योजनेचा लाभ अनुज्ञेय राहील.

४. <u>योजनेची कार्यपध्दती</u> :-

४(१) अनुदानीत/विना अनुदानीत प्राथमिक, माध्यमिक शाळा, जिल्हा परिषदांच्या शाळा, नगरपालिका व महानगरपालिकांच्या शाळांमध्ये इ.१ ली ते १० वी मध्ये शिक्षण घेणाऱ्या अनुसूचित जमातीच्या पात्र विद्यार्थ्यांना या योजनेचा लाभ घेता येईल.

४(२) सदर योजनेखाली शाळेमध्ये प्रवेशित विद्यार्थ्यांचे आवेदनपत्र भरुन घेण्याची संपुर्ण जबाबदारी संबंधित शाळा/संस्थेची राहील.

४(३) या योजनेचा लाभ घेण्यासाठी विद्यार्थी व त्याचे आई/वडिल यांनी विहित नमुन्यात (परिशिष्ट-अ प्रमाणे) अर्ज करुन तो शाळेच्या मुख्याध्यापकाकडे द्यावा. संबंधित मुख्याध्यापकांनी अर्ज भरुन घेऊन अर्जाची छाननी करुन सर्व अर्ज संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांच्याकडे सादर करावेत. आई/वडिल हयात नसल्यास विद्यार्थ्यांच्या पालकांनी अर्ज सादर करावेत.

४(४) अर्जदार अनुसूचित जमातीचे असल्याचे सक्षम अधिकाऱ्याने दिलेले जातीचे प्रमाणपत्र अर्जासोबत सादर करणे आवश्यक राहील. जर एखाद्या विद्यार्थ्याच्या अनुसूचित जमातीच्या प्रमाणपत्राबाबत शंका वाटल्यास प्रकल्प अधिकारी यांनी त्या अर्जदाराच्या अनुसूचित जमाती प्रमाणपत्राची पडताळणी संबंधित अनुसूचित जमाती प्रमाणपत्र पडताळणी समितीकडून करुन घ्यावी.

४(५) संबंधित शाळांच्या मुख्याध्यापकांनी दरवर्षी शाळांतील प्रवेश अंतिम झाल्यापासून १ महिन्यात किंवा जुलै अखेर पर्यंत त्यांचे प्रस्ताव संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांचेकडे सादर करावेत.

४(६) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी शिष्यवृत्तीचे वाटप करण्यासाठी सी.बी.एस./ ई.सी.एस. पध्दतीचा अवलंब करावा. त्यासाठी त्यांनी ज्या राष्ट्रीयीकृत बँकेत सी.बी.एस./ ई.सी.एस. ची सुविधा उपलब्ध आहे त्या बँकांमध्ये दि. ३०.६.२०१० पर्यंत खाती उघडण्याबाबत सर्व पात्र विद्यार्थ्यांच्या पालकांना सुचना द्याव्यात.

४(७) जी राष्ट्रीयीकृत बँक भ्रमणध्वनीवर(असल्यास) तसेच आई/वडिलांच्या पत्रव्यवहाराच्या पत्त्यावर शिष्यवृत्तीची रक्कम जमा झाल्याचा संदेश SMS तसेच पत्राव्दारे मोफत पाठवेल, तसेच आई/वडिलांचे शुन्य शिलकीचे (झिरो बॅलन्स) खाते उघडण्यास तयार असेल अशा राष्ट्रीयकृत बँकेस प्राधान्य द्यावे.

४(८) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी प्राप्त सर्व प्रस्तावांवर दरवर्षी ऑगस्ट अखेरपर्यंत छाननी व मंजूरीची कार्यवाही पूर्ण करुन शिष्यवृत्तीची देय रक्कम संबंधित विद्यार्थ्यांच्या आई/वडिलांच्या बँक खात्यावर खालीलप्रमाणे तीन हप्त्यात जमा करतील.

| अ. क्र. | शिष्यवृत्तीचा हप्ता | शिष्यवृत्तीचा कालावधी | शिष्यवृत्ती वाटपाचा दिनांक |
|---|---|---|---|
| १ | पहिला हप्ता ( ३०%) | दि. १५ जून ते १५ सप्टेंबर | दि.१५ सप्टेंबर ते ३० सप्टेंबर |
| २ | दुसरा हप्ता ( ३०%) | दि.१६ सप्टेंबर ते १५ डिसेंबर | दि.१५ डिसेंबर ते ३१ डिसेंबर |
| ३ | तिसरा हप्ता ( ४०%) | दि.१६ डिसेंबर ते १५ एप्रिल | दि. १५ मार्च ते ३१ मार्च |

४(९) प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी शिष्यवृत्ती वाटपाची स्वतंत्र, प्रमाणित व अद्ययावत नोंदवही ठेवावी.

४(१०) शिक्षण विस्तार अधिकारी/उप शिक्षणाधिकारी तसेच आयुक्त/ अपर आयुक्त, आदिवासी विकास कार्यालयातील अधिकारी शाळांना भेटी देण्यासाठी अथवा तपासणीसाठी जातील तेव्हा त्यांनी विद्यार्थी व त्यांचे आई/वडिल/पालक यांच्याशी संपर्क साधून शिष्यवृत्तीची रक्कम त्यांना मिळाली किंवा कसे याची अभिलेखाच्या आधारावर पाहणी करावी.

५. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.आवगृ-१००३/प्र.क्र.२६(२००३)/का.१२, दि.१४.१०.२००३ अन्वये अनुसूचित जमातीच्या इ.१ ली ते १० वी मध्ये शिकणाऱ्या मुलींचे गळतीचे प्रमाण थांबविण्याकरिता शिष्यवृत्ती देण्याची सुरु केलेली योजना सन २००९-१० हे शैक्षणिक वर्ष संपण्याच्या दिनांकापासून बंद करण्यात येत आहे.

६. या शासन निर्णयाव्दारे सुरु केलेली "सुवर्ण महोत्सवी आदिवासी पुर्व माध्यमिक शिष्यवृत्ती योजना" इ.१ ली ते १० वी मध्ये शिक्षण घेणाऱ्या अनुसूचित जमातीच्या सर्व पात्र विद्यार्थ्यांना व विद्यार्थिनीना उपरोक्त परिच्छेद ३ मधील अटी व शर्तींच्या अधिन राहून शैक्षणिक वर्ष २०१०-११ पासून अनुज्ञेय करण्यात येत आहे.

७. शिष्यवृत्तीचे प्रस्ताव विहीत वेळेत सादर करणे व शिष्यवृत्ती त्वरीत वेळेत अदा करण्याची जबाबदारी संबंधित मुख्याध्यापक व प्रकल्प अधिकारी यांची राहील. यात विलंब होण्यास जबाबदार असलेले अधिकारी व कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील. त्यानुसार त्यांच्या वरिष्ठ अधिका-यांनी संबंधित अधिकारी व कर्मचारी यांचेविरुध्द शिस्तभंगाची योग्य ती कारवाई करावी.

८. सदर योजना सन २०१०-२०११ या शैक्षणिक वर्षापासून लागू करण्यात येत आहे.

९ सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २१८/०९/व्यय १४, दिनांक-२२.६.२००९ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००५३१२०४०२६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( भ. प्र. सिंह )
शासनाचे सह सचिव

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
शिक्षण संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक (५ प्रती)
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
विभागीय आयुक्त, नाशिक/पुणे/औरंगाबाद/नागपूर.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
विभागीय शिक्षण सह संचालक,नाशिक/पुणे/औरंगाबाद/नागपूर.
वित्त विभाग (व्यय-१४/अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई.
मा. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
सर्व सह सचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग.
निवड नस्ती, (का.१२ ),आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

(शासन निर्णय क्र.आदिशी-२००९/प्र.क्र.२०/का.१२, दि. ३१ मे, २०१० सोबतचे सहपत्र)

# परिशिष्ट-अ

## अर्जाचा नमुना

फोटो

### सुवर्ण महोत्सवी आदिवासी पूर्व माध्यमिक शिष्यवृत्ती योजना.

१. शाळेचे नाव व पत्ता :-

२. **विद्यार्थ्यांची माहिती.**

१) विद्यार्थ्यांचे पूर्ण नाव (शाळेमधील अभिलेखानुसार) :-

२) वर्ग : इयत्ता -----

३) आईचे नाव :-

४) वडिलांचे नाव :-

५) आई/वडिलांचा कायमचा पूर्ण पत्ता :-

६) आई/वडिलांचा सध्याचा पूर्ण पत्ता (पत्रव्यवहारासाठी) :-

७) विद्यार्थ्यांची/विद्यार्थिनीची जन्मतारिख व वय :-

८) लिंग - पुरुष/स्त्री

९) अनुसूचित जमाती मधील जमात व पोट जात :-

१०) मागील वर्षी शिकत असलेल्या शाळेचे नाव :-

११) मागील वर्षी मिळालेल्या शिष्यवृत्तीबाबतची सविस्तर माहिती :-

३. **आई/ वडिलांची माहिती.** *

१) आईचे नाव:-

२) वडिलांचे नाव :-

३) वडिलांचा व्यवसाय :-

४) कुटुंबाचे एकूण वार्षिक उत्पन्न :-

अ) आई व वडिल नोकरी मध्ये असल्यास त्या मधून मिळणारे एकूण वार्षिक उत्पन्न (उदा. मुळ वेतन+सर्व भत्ते):-

ब) अन्य मार्गाने मिळणारे वार्षिक उत्पन्न :-

५) आई/वडिलांचे खाते असलेल्या राष्ट्रीयकृत बँकेचे नाव :-

शाखा :-

खाते क्रमांक :-

* वडील हयात नसल्यास आईची माहिती दयावी. आई व वडील दोन्ही हयात नसल्यास इतर पालक ज्यावर विद्यार्थी/विद्यार्थीनी पूर्णपणे अवलंबून आहे, त्यांची वरीलप्रमाणे माहिती दयावी.

(अर्जासोबत विद्यार्थ्यांचा जातीचा दाखला, आई व वडीलांचा उत्पन्नाचा दाखला यांच्या सत्यप्रती जोडाव्यात. वडिल हयात नसल्यास त्यांच्या मृत्यूचा दाखला जोडावा. आई व वडिल दोघेही हयात नसल्यास पालकांबाबत सविस्तर माहिती वरील अनुक्रमांक ३ येथे नमूद करावी.)

## हमीपत्र

मी /आम्ही खाली सही करणार /करणारे प्रतिज्ञापत्र करतो/करते की, सुवर्ण महोत्सवी आदिवासी पुर्व माध्यमिक शिष्यवृत्ती मिळण्यासाठीच्या अटी व शर्ती मला/आम्हास मान्य आहेत. अर्जात वरीलप्रमाणे दिलेली सर्व माहिती पूर्णपणे सत्य आहे. सदरची माहिती खोटी अथवा अपूरी आढळल्यास भारतीय दंड विधान नियम १९९ व २०० तसेच इतर नियम आणि कायद्याप्रमाणे होणा-या दंडास/शिक्षेस मी/आम्ही पात्र राहीन/राहू. मी/आम्ही दिलेली कोणतीही माहिती वा निवेदन चूकीचे आढळून आल्यास सक्षम प्राधिका-याने दिलेला निर्णय अंतिम असेल व तो माझ्यावर /आम्हांवर बंधनकारक असेल अशी मी/आम्ही हमी देतो/देते. जर शिष्यवृत्तीची रक्कम जास्तीची मिळाली तर ती मी/आम्ही परत करेन/करु. अशी जास्तीची अथवा अन्य कारणांमुळे वसुल करण्यात येणारी रक्कम मी/आम्ही पूर्णपणे परत करण्याची हमी देतो/देते. आमचे उत्पन्नाचे व जातीची माहिती खोटी आढळल्यास होणा-या कारवाईस मी/आम्ही स्वत: जबाबदार राहू.

**अर्जदाराच्या आई/वडीलांची सही** **विद्यार्थी/विद्यार्थिनीची सही**

**आई/वडिल हयात नसल्यास**
**पालकाची सही व अर्जदाराशी नाते.**

## शाळेने भरावयाची माहिती

अर्जदाराने वरील अर्जात दिलेली सर्व माहिती, त्याच्या कुटुंबाचे सर्व मार्गानी मिळणारे वार्षिक उत्पन्न, शैक्षणिक माहिती पुर्णपणे तपासलेली असून ती बरोबर आहे. तसेच शासन निर्णय क्र.आविशि २००९/प्र.क्र.२०/का.१२ दिनांक 31 मे, २०१० मधील नमूद सर्व अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याने सदर विद्यार्थ्याला/विद्यार्थिनीला शिष्यवृत्ती देण्यास शिफारस करण्यात येत आहे.

**मुख्याध्यापकाची सही**

**नाव व पदनाम**

**शाळेचा शिक्का**

----------